**मे. सिकॉम लि. यांच्या मौ. परसोडी, डोर्ली व सिंदी, ता. सेलू , जि.वर्धा येथे सुमारे ३५० एकर जमिन ड्राय पोर्ट साठी हस्तातरण सुलभ करण्यकरिता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण -१०१५/ प्र.क्र.०४/उद्योग-८,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : १२ मे, २०१५

**संदर्भ :** शासन पत्र गृह विभाग क्र. बैठक - १२१४/ प्र.क्र.१८५/बंदरे, दि. २०.०३.२०१५

**प्रस्तवना:**

मे. सिकॉम लि. यांच्याकरीता मौ. परसोडी, डोर्ली व सिंदी, ता. सेलू , जि. वर्धा येथे सुमारे ३५० एकर जमिन संपादीत करण्यात आलेली आहे. प्रस्तुत सिकॉम करीता संपादीत करण्यात आलेली जमीन औद्योगिक वापरासाठी जवाहरलाल नेहरु पोर्ट ट्रस्ट यांनी त्यांच्या प्रस्तावित वर्धा जिल्हयात ड्रायपोर्ट प्रकल्पाकरीता मागणी केली असून त्याबाबतचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन आहे.

२. सदर प्रयोजनासाठी मा. केंद्रीय जहाज मंत्री व राज्याचे मुख्यमंत्री यांच्या समवेत दि.२६.०२.२०१५ रोजी बैठक संपन्न झाली होती. प्रस्तुत बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधीन दि. २०.०३.२०१५ च्या पत्रान्वये गृह विभागाने निर्गमित केले होते. प्रस्तुत इतिवृत्तातील मुद्दा क्र. २ येथे नमूद बाबीच्या अनुषंगाने सिकॉमच्या वर्धा येथील जमिनीचे संदर्भात भूसंपादन अधिनियम २०१३ च्या तरतूदीच्या अनुषंगाने तपासून जेएनपीटीचा ड्रायपोर्ट प्रकल्प पुढे जाण्याच्या हेतूने सन्मानजनक तोडगा काढण्यासाठी विभागीय आयुक्त नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याची शिफारस करण्यात आली.

**शासन परिपत्रक:**

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता मे. सिकॉम लि. यांच्या मौ. परसोडी, डोर्ली व सिंदी ता. सेलू, जि. वर्धा येथे अधिग्रहीत सुमारे ३५० एकर जमिन जेएनपीटीचा ड्रायपोर्ट प्रकल्पासाठी हस्तांतरण सुलभ होण्याकरीता व तेथील शेतकऱ्यांची अतिरिक्त मोबदला देण्याबाबतची मागणी भूसंपादन अधिनियम २०१३ च्या पार्श्वभूमीवर तपासून सन्मानजनक तोडगा काढण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

- विभागीय आयुक्त, नागपूर - अध्यक्ष
- जिल्हाधिकारी, वर्धा - सदस्य
- श्री. महेश गोसावी,
  व्यवस्थापकीय संचालक, मे. सिकॉम रियालीटी - सदस्य सचिव
- श्री. आशिष कुमार बोस,
  मुख्य व्यवस्थापक,वाहतुक व वित्त, जेएनपीटी - सदस्य
- श्री. गावडे, उप सचिव , महसूल व वन विभाग - सदस्य

**समितीची कार्यकक्षा :**

१. मे. सिकॉम लि. यांच्या मौ. परसोडी, डोर्ली व सिंदी ता. सेलू, जि. वर्धा येथे अधिग्रहीत सुमारे ३५० एकर जमिन जेएनपीटीचा ड्रायपोर्ट प्रकल्पासाठी हस्तांतरण सुलभ होण्याकरीता व तेथील शेतकऱ्यांची अतिरिक्त मोबदला देण्याबाबतची मागणी भूसंपादन अधिनियम २०१३ च्या पार्श्वभूमीवर तपासून सन्मानजनक तोडगा काढणे.

२. समितीने निश्चित केलेला मोबदला व अन्य उपाययोजना बाबत आपल्या सूचना जेएनपीटी यांना सादर कराव्यात जेएनपीटीने सदर प्रकरणी सूचनेप्रमाणे कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१६२३०४५११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: CN = Sanjay Shankarrao Ingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industry Energy & Labour Department
Date: 2015.05.12 16:26:05 +05'30'

**(संजय इंगळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
२. विभागीय महसूली आयुक्त, नागपूर.
३. जिल्हाधिकारी, वर्धा.
४. श्री. महेश गोसावी, व्यवस्थापकीय संचालक, मे. सिकॉम रियालीटी लि.
५. श्री. आशिष कुमार बोस, मुख्य व्यवस्थापक,वाहतुक व वित्त, जेएनपीटी.
६. श्री गावडे, उप सचिव ,महसूल व वन विभाग.